**अपंग व्यक्ती, वरिष्ठ नागरिक व समाजातील दुर्लक्षित घटक यांच्यासाठी स्थापन ११ विशेष न्यायालयातील ५५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३२३/प्र.क्र.२०/का-९**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- १५ मार्च, २०२३

**पहा :** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र: जगन्या १३१४/प्र.क्र.१६४/का-९, दि.०३.०३.२०१८.
२) जिल्हा न्यायालय, ठाणे जा. क्र. आस्था/गो.अ./३३/२०२३,दि.०३.०१.२०२३ चे पत्र
३) जिल्हा न्यायालय, लातूर क्र.HKW/(Adm.)/३९७/२०२३,दि.१३.०१.२०२३ चे पत्र
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

अपंग व्यक्ती, वरिष्ठ नागरिक व समाजातील दुर्लक्षित घटक यांच्याशी संबंधित १००० पेक्षा जास्त प्रकरणे प्रलंबित आहेत अशा ११ ठिकाणी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ११ विशेष न्यायालये स्थापन करण्यास व सदर न्यायालयांकरीता आवश्यक ५५ अस्थायी पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या ११ विशेष न्यायालयांसाठीच्या अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. त्यानुसार संबंधित जिल्हा व सत्र न्यायालयांकडून शासनास प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये ०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपंग व्यक्ती, वरिष्ठ नागरिक व समाजातील दुर्लक्षित घटक यांच्यासाठी स्थापन ११ विशेष न्यायालयांतील एकूण ५५ अस्थायी पदांना ०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | जिल्हा न्यायाधीश | ११ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ११ |
| ३ | वरिष्ठ लिपीक | ११ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ११ |
| ५ | शिपाई | ११ |
| | **एकूण पदे** | ५५ |

२. याकरिता येणारा खर्च "२०१४, न्यायदान- (भारित) १०२- उच्च न्यायालये, १०२(०९)(०१) न्यायालयांची दर्जावाढ व प्रलंबित प्रकरणे त्वरीत निकालात काढण्यासाठी विशेष अनुदाने (अनिवार्य) २०१४ ०३८८" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८.०२.२०२३ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२३०३१५११५६५४७२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.15 12:00:57 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. मा. प्रबंधक (निरिक्षणे-१), मा.उच्च न्यायालय, मुंबई,
३. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
४. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी, मुंबई, ठाणे, अहमदनगर, सातारा, लातूर, पुणे, नागपूर, सांगली, नाशिक व औरंगाबाद (मा. उच्च न्यायालयामार्फत)
५. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी, मुंबई, ठाणे, अहमदनगर, सातारा, लातूर, पुणे, नागपूर, सांगली, नाशिक व औरंगाबाद
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल -एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
९. महालेखापाल -दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१०. विधि व न्याय विभाग कार्यासन-२३,२४,२५,
११. निवडनस्ती- कार्या. ९.